G.R. 20040406151429001-0100

अपर जिल्हाधिकारी, उप सचिव व त्यापेक्षा ज्येष्ठ
अधिकाऱ्यांविरुध्दची विभागीय चौकशी
सचिव व विशेष चौकशी अधिकारी [२] व उप
सचिव व सादरकर्ता अधिकारी [२] यांचेकडे
सोपविणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-१९९७/प्र.क्र. २/९५/१०-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १८ मे, १९९८.

वाचा : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: आस्थापना-१९९६/प्र.क्र. ३/२६/१९-अ, दिनांक २७ मार्च, १९९८.

-: परिपत्रक :-

अखिल भारतीय सेवेतील अधिकारी, विभाग प्रमुख व मंत्रालयीन विभागातील
उप सचिव आणि सह सचिव स्तरावरील अधिकाऱ्यांविरुध्द उद्भवणाऱ्या विभागीय
चौकशीच्या प्रकरणात चौकशी करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापने-
वर विशेष चौकशी अधिकाऱ्याचे पद निर्माण करण्यात आले आहे. या चौकशी अधि-
काऱ्याकडील प्रलंबित विभागीय चौकशी प्रकरणांची वाढती संख्या लक्षात घेऊन
शासनाने दि. २७ मार्च, १९९८ च्या शासन निर्णयान्वये सामान्य प्रशासन विभागाच्या
आस्थापनेवर अजून एक सचिव व विशेष चौकशी अधिकाऱ्याचे पद निर्माण करण्यात
आले आहे. हे पद निर्माण करण्यात आल्यामुळे सध्याचे विशेष चौकशी अधिकाऱ्याचे
पदनाम "अपर मुख्य सचिव व विशेष चौकशी अधिकारी [१]" व सादरकर्ता अधिकाऱ्याचे पदनाम "सह सचिव व
सादरकर्ता अधिकारी [१]" असे करण्यात आले आहे. नव्याने निर्माण करण्यात
आलेल्या सचिव व विशेष चौकशी अधिकाऱ्याचे पदनाम "सचिव व विशेष चौकशी
अधिकारी [२] व सादरकर्ता अधिकाऱ्याचे पदनाम "उप सचिव व सादरकर्ता
अधिकारी [२]" असे करण्यात आले आहे. या नवीन पदाच्या निर्मितीनंतर अपर
मुख्य सचिव व विशेष चौकशी अधिकारी [१] व सह सचिव व सादरकर्ता अधिकारी

[......२.

१] यांचेकडे फक्त अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांची प्रकरणे सोपविण्यात यावीत.

२. अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांव्यतिरिक्त राज्य सेवेतील अतिरिक्त जिल्हाधिकारी, सह संचालक, अतिरिक्त संचालक, संचालक, अधीक्षक अभियंता, मुख्य अभियंता, उप सचिव/सह सचिव, विभाग प्रमुख किंवा या संवर्गाशी समकक्ष किंवा वरिष्ठ असलेल्या स्तर संवर्गातील अधिका-यांविरुध्दची विभागीय चौकशीची प्रकरणे "सचिव व विशेष चौकशी अधिकारी [२]" व "उप सचिव व सादरकर्ता अधिकारी [२]" यांचेकडे सोपविण्यात यावीत.

३. या संवर्गातील ज्या अधिका-यांविरुध्दची विभागीय चौकशीची प्रकरणे सध्याच्या विविध अधिका-यांकडे चौकशीसाठी सोपविण्यात आली असतील व ती चौकशीच्या अंतिम टप्प्यापर्यंत पूर्ण झाली नसतील तर अशी प्रकरणे संबंधित शिस्तभंग विषयक अधिका-यांनी "सचिव व विशेष चौकशी अधिकारी [२]" यांचेकडे सोपविण्याबाबत तात्काळ आदेश काढावेत. सोबतच्या प्रपत्रातील नमूद केलेल्या अधिका-यांविरुध्दची प्रकरणे देखील या चौकशी अधिका-यांकडे सोपवि-ण्याबाबत वर नमूद केल्याप्रमाणे जर ती अंतिम टप्प्यावर पोहोचली नसतील तर या प्रकरणांमध्ये "सचिव व चौकशी अधिकारी [२]" व "उप सचिव व सादरकर्ता अधिकारी [२]" यांच्या नेमणुकीबाबतचे आदेश संबंधित विभागांनी तात्काळ काढावेत व चौकशीच्या प्रकरणाचे अद्ययावत अभिलेख चौकशी अधिका-यांकडे पाठविण्याची तात्काळ कार्यवाही करावी. यापुढे सुरु होणारी प्रकरणे या अधिका-यांकडेच सोपविणे आवश्यक राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[मा. ना. बागुल],
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,

मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,

मुख्य सचिव,

अपर मुख्य सचिव व विशेष चौकशी अधिकारी [१],

सह सचिव व सादरकर्ता अधिकारी [१],

सचिव व विशेष चौकशी अधिकारी [२],

उप सचिव व सादरकर्ता अधिकारी [२],

शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,

× सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र-१, मुंबई,

महालेखापाल [लेखापरीक्षा], महाराष्ट्र-१, मुंबई,

महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र-२, नागपूर,

महालेखापाल [लेखापरीक्षा], महाराष्ट्र-२, नागपूर,

निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख,

सर्व मंत्रालयीन विभाग,

गृह विभाग/पोल-२,

महसूल व वन विभाग/फ-७,

निवड नस्ती.

--

× [illegible]

| | |
|---|---|
| 1. Agriculture & ADF Department | Shri R.D.Mule,<br>Additional Director,<br>Agriculture. |
| 2. Industrial Energy & Labour Department | Shri [illegible].K. Jadhav,<br>Joint Director of<br>Industries. |
| 3. Irrigation Department | Shri P.L.Ganu<br>Retd. C.E. |
| 4. ----"----- | Shri M.K. Kulkarni<br>S.E. |
| 5. ----"---- | Shri K.U.Kadam<br>C.E. |
| 6. ----"---- | ----"---- |
| 7. ----"---- | ----"---- |
| 8. ----"---- | Shri H.K.Pasrate,<br>Supttd. Engineer |
| 9. Public Works Department | Shri J.M.Kokane.<br>supttd. Engineer |
| 10- ----"---- | Shri H.M. Oswal,<br>Executive Engineer. |
| 11. ----"---- | Shri. J.M. Kokane |
| 12. ----"---- | Shri P.C.Datar |
| 13. ....".... | Shri D.G.Marathe |
| 14. ----"---- | Shri R.G.Sawant |
| 15. ----"---- | Shri B.S.Chavan |
| 16. ----"---- | Shri C.D.Fakir |
| 17. ----"---- | Shri R.G.Sawant |
| 18. .--"----- | Shri S.S. Momin |
| 19. ----"---- | Shri S.G.Sinfal |
| 20. ----"---- | Shri K.H.Waghmare |
| 21. ----"---- | Shri S.P.Patil |
| 22. ----"---- | Shri S.S.Momin |
| 23. ----"---- | Shri S.G.Sinfal |